**एकात्मिक बाल संरक्षण योजनेअंतर्गत महाराष्ट्र राज्य बाल संरक्षण संस्थेला (MSCPS) सन २०१४-१५ करिता निधी उपलब्ध करून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्र. ICPS-२०१४/प्र.क्र.१९०/का-८,**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीख: १९ जानेवारी,२०१५.

<u>वाचा :-</u>

१) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं ३-अर्थसंकल्प/६६.क्र.प्र/२०१४-दि १७.एप्रिल,२०१४
२) शासन परिपत्रक, क्र४-का /११०.क्र.प्र /२०१४-अंदाज., दि १ .जुलै, २०१४
३) शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि. २ जानेवारी,२०१५

<u>प्रस्तावना :-</u>

राज्यातील बाल विकासाशी सबंधित यंत्रणा, योजनांची गुणवत्ता वाढविणे व त्या अधिक बळकट करण्यासाठी एकात्मिक बाल संरक्षण योजना (ICPS) ही केंद्र पुरस्कृत योजना राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. या योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वाप्रमाणे महाराष्ट्र राज्य बाल संरक्षण संस्था (MSCPS) ची नोंदणी अधिनियम १८६० खाली, नोंदणी करण्यात आली आहे. या योजनेकरीता एकात्मिक बाल संरक्षण योजनेसाठी विभागाने सन २०१४-१५ करिता रक्कम रु.१०००००हजार (रुपये दहा कोटी फक्त) इतकी तरतूद केली आहे. सदर तरतूदीपैकी ६०% तरतूद वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०१४-१५ साठी एकात्मिक बाल संरक्षण योजनेखाली असलेल्या सर्व यंत्रणा तसेच शासकीय व स्वयंसेवी संस्था यांचेकरीता रक्कम रु.१०००००हजार (रुपये दहा कोटी फक्त) इतकी तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूदीपैकी ६०% रक्कम रु.६००००हजार (रुपये सहा कोटी फक्त) इतकी तरतूद महाराष्ट्र राज्य बाल संरक्षण संस्थेला ( Maharashtra State Child Protection Society ) वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१४-१ ५या वित्तीय वर्षासाठी मागणी २२३५९१९-ए-, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, १९९, अशासकीय संघटनांना सहाय्य (००) (०१), एकात्मिक बाल संरक्षण योजना,

(२२३५ ए ९१९), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर निधीचे नियंत्रण करण्यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण, नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. रक्कम रु.६०००००हजार (रुपये सहा कोटी फक्त) एकात्मिक बाल संरक्षण योजनेंतर्गत या बाबींसाठी खर्च होईल याची दक्षता आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी घ्यावी. एकात्मिक बाल संरक्षण योजनेंतर्गत होणाऱ्या उपरोक्त तरतूदीबाबत खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र महाराष्ट्र राज्य बाल संरक्षण संस्थेने आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचेमार्फत केंद्र शासन व राज्य शासनाला सादर करावेत.

४. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.विवि/शिकाना/१८९, दि. ११.१२.२०१४अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201412121253578630 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasave Vijesing F

Digitally signed by Vasave Vijesing F
DN: CN = Vasave Vijesing F, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Women and Child Department
Reason: I am the author of this document
Date: 2015.01.28 18:25:12 +05'30'

**वि.फ.वसावे**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रत,
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई.
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल, (लेखा परीक्षा)/, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे
उप सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
वित्त विभाग (अर्थसं-३/व्यय-६), मंत्रालय, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

उप आयुक्त (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
कार्यक्रम व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य बाल संरक्षण संस्था, पुणे.
कक्ष अधिकारी, कार्यासन-३,व ४, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती/का-८